केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम ( PMJVK) अंतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील चिखली, खामगाव, शेगाव व मोताळा गटातील मान्यताप्राप्त आरोग्यविषयक विकासकामांच्या अंमलबजावणीसाठी अनुदान ( केंद्र व राज्य हिस्सा ) वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०१९/प्र.क्र.२५/का-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
तारीख: १८/११/२०१९

**संदर्भ** -

**१) जिल्हाधिकारी,बुलडाणा यांचे पत्र जा.क्र.कावी/अका/अल्पसंख्याक कक्ष/७८/२०१९. दि.०२/०३/२०१९**

**२) अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/६१/२०१९-MsDp-MOMA,दि २६/०९/२०१९.**

**३) शासन ज्ञापन : क्रमांकः अविवि-२०१९/प्र.क्र.२५/ का.०७. दिनांक- १८/११/२०१९.**

**प्रस्तावना** -

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमा PMJVK ( पूर्वीचा बहु क्षेत्रिय विकास कार्यक्रम- MsDP ) अंतर्गत राज्यातील बुलडाणा जिल्ह्यातील, चिखली, खामगाव, शेगाव व मोताळा गटातील जि. प उर्दु प्राथमिक/माध्यमिक शाळेत स्वच्छतागृहे बांधकामाचा रु. ४४.०० लाख इतक्या रकमेचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या सहमतीने केंद्र शासनास पाठविण्यात आला होता. त्यानुषंगाने १२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) गठित शक्तिप्रदान समितीने दि. १३/०९/२०१९ रोजी झालेल्या १८ व्या बैठकीत बुलडाणा जिल्हयातील चिखली, खामगाव, शेगाव व मोताळा गटातील जि. प उर्दु प्राथमिक/माध्यमिक शाळेत स्वच्छतागृहे बांधकामाचा रु. ४४.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भाधिन क्र. (२) अन्वये कळविण्यात आले आहे. सदर प्रस्तावात केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० या प्रमाणात असून त्यामध्ये केंद्र शासनाचा एकूण हिस्सा २६.४ लाख व राज्य शासनाचा एकूण हिस्सा रू. १७.६ लाख इतका आहे. तसेच केंद्र शासनाने संदर्भ क्र. २ येथील आदेशाद्वारे PMJVK अंतर्गत विषयांकित ०४ गटातील मान्याताप्राप्त आरोग्यविषयक विकासकामांच्या अमंलबजावणीकरीता मंजूर / वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. १३.२ /- लाख तसेच राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू.८.८ /- लाख असा एकूण ( केंद्र + राज्य ) रू.२२.०० /- लाख इतका निधी जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना मंजूर करून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

२. संदर्भ क्रमांक (२) येथील आदेशास अनुसरून प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमा अंतर्गत विषयाकिंत ०४ गटातील मान्यताप्राप्त आरोग्यविषयक विकासकामांसाठी **केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. १३.२ /- लाख (अक्षरी तेरा लाख विस हजार रूपये फक्त ) तसेच राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. ८.८ /- लाख ( अक्षरी आठ लाख ऐंशी हजार रूपये फक्त ) असा एकूण ( केंद्र + राज्य ) रू. २२.०० /- लाख इतका निधी** विविध अटींच्या अधीनतेने जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना खालील तक्त्यातील स्तभं क्र (९) व (१०) प्रमाणे मंजूर करून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमा अंतर्गत विषयाकिंत ०४ गटातील मान्यताप्राप्त आरोग्यविषयक विकासकामांचा संक्षिप्त तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| S.No | Block | Name of Project | No. of Unit | Unit Cost | Central Share | State Share | Total | GOI st Instalment | GOM 1st Instalment |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| **1** | Chikhali | Toilets in Z.P. Urdu pri School | 7 | 2.00 | 8.40 | 5.60 | 14.00 | 4.20 | 2.80 |
| **2** | Khamgaon | Toilets in Z.P. Urdu pri School | 7 | 2.00 | 8.40 | 5.60 | 14.00 | 4.20 | 2.80 |
| **3** | Shegaon | Toilets in Z.P. Urdu pri School | 2 | 2.00 | 2.40 | 1.60 | 4.00 | 1.20 | 0.8 |
| **4** | Motala | Toilets in Z.P. Urdu pri School | 6 | 2.00 | 7.20 | 4.80 | 12.00 | 3.60 | 2.40 |
| **Total** | | | **22** | | **26.4** | **17.6** | **44** | **13.2** | **8.8** |

४. उपरोक्त तक्त्यातील स्तभं क्र (४) येथील विकासकामांचा सविस्तर तपशील ( मान्यताप्राप्त आरोग्यविषयक विकासकामांचा तपशीलवार पत्ता, कोड नं., युनिट निहाय मंजूर/वितरीत निधी इ.) दर्शविणारे परिशिष्ट "**अ**" हे दिनांक १८/११/२०१९ रोजीच्या शासन ज्ञापनासोबत जोडण्यात आले आहे. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी विषयांकित ०४ गटातील विकासकामांची अमंलबजावणी ही परिशिष्ट "**अ**" मध्ये नमूद विकासकामनिहाय संबंधित कोड क्रमांकानुसार करणे आवश्यक राहील.

५. उपरोक्त तक्त्यातील स्तभं क्र (९) व (१०) प्रमाणे सन २०१९-२० या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील विषयांकित ०४ गटातील मान्यताप्राप्त

आरोग्यविषयक विकासकामांकरिता केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. १३.२ /- लाख (अक्षरी तेरा लाख विस हजार रूपये फक्त ) तसेच राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू.८.८ /- लाख ( अक्षरी आठ लाख ऐंशी हजार रूपये फक्त ) असा एकूण ( केंद्र + राज्य ) रू. २२.०० /- लाख इतका निधी जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

६. सन २०१९-२० या वर्षात जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(९) व (१०) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमा अंतर्गत विषयांकित ०४ गटातील जिल्हा परिषदेंच्या शाळेत स्वच्छता गृहे बांधकामासाठी या योजनेकरीता आहरित केलेली रक्कम संबंधित अमंलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

७. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त आरोग्यविषयक विकासकामांच्या अमंलबजावणीकरिता संबंधित गटनिहाय **जिल्हा मुख्य नियंत्रक व अमंलबजावणी अधिकारी** हे **जिल्हाधिकारी, बुलडाणा** राहील तसेच **अमंलबजावणी यंत्रणा** ही **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद बुलडाणा ( बांधकाम विभाग )** राहील

८. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त विकासकामांमधील आरोग्यविषयक विकासकामांची अमंलबजावणी ही राष्ट्रीय आरोग्य मिशन (NHM) अंतर्गत विहीत मानकांनुसार करण्यात यावी.

९. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीकरिता संबंधित अमंलबजावणी यंत्रणेने आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करून घ्यावी. शासन निकषानुसार तसेच विकासकामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मंजुरीनुसार निविदा प्रक्रिया करावी. सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मंजुरी तसेच प्रत्यक्ष निधी प्राप्त झाल्याशिवाय कामास सुरूवात करू नये. विकासकामांशी संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून निर्गमित करण्यात येणा-या तांत्रिक मंजुरीच्या/कामाच्या आदेशानुसार, विकासकामांची अमंलबजावणी विहीत कालावधीत पूर्ण करण्याबाबत जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी दक्षता घ्यावी.

१०. शासन पत्र, क्र. अविवि-२०१५/प्र.क्र.६८/का.७, दि.२८/०३/२०१६ मधील निर्देशानुसार PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीकरिता केंद्र + राज्य हिश्श्या अंतर्गत मंजूर निधी सुरक्षिततेच्या द्दषटिकोनातून केवळ राष्ट्रीयीकृत बँकेत ठेवण्यात यावा.

११. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१६/०२/२०१५ रोजीच्या पत्रातील सूचनांनुसार बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) वितरीत करण्यात येणा-या निधीस VAT वा कोणत्याही प्रकारचे विभागीय कर लागू राहणार नाहीत.

१२. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

१३. अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत विकासकामांच्या बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) दि. ३१/०३/२०१६ रोजीच्या शासन निर्णया सोबत जोडलेल्या परिशिष्ट **"ब"** व **"क"** मधील विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रांसह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत विकासकामांच्या बांधकामाची माहिती वेळोवेळी Upload करावी.

१४. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीसाठी दुस-या टप्प्यातील निधीची मागणी करताना पहिल्या टप्प्यात प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रांसह) प्रस्तावासोबत शासनास सादर करावी.

१५. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त स्वच्छतागृहे बांधकाम करताना महिला स्वच्छतागृहे बांधकामास प्राथम्य देण्यात यावे.

१६. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम अंतर्गत प्रस्तावित कामाच्या ठिकाणी ठळकपणे निदर्शनास येईल अशा ठिकाणी फलक लावण्यात य़ावा व त्यावर खालील बाबीचा समावेश करण्यात यावा.

- भारत सरकारचे राजचिन्ह /भारत सरकारच्या मंत्रालय /विभगाचे नाव
- प्रकल्प किंमत / केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण.
- योजनेचे नाव.
- काम सूरू होण्याचा दिनांक.
- अंमलबजावणी यंत्रणा.
- अधिकच्या माहिती व अभिप्रायासाठी अधिकारी/ अंमलबजावणी यंत्रणा यांचे संपर्काचा तपशिल संकेतस्थळासह.

१७. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि. १४/१२/२०१५ रोजीच्या बैठकीतील सूचनेनुसार प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम अंतर्गत ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करून वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनार्थ सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिका-यावर कारवाई करण्यात येईल. तसेच प्रस्तावित विकासकामाकरिता अन्य कोणत्याही योजनेतून अनुदानाचा लाभ घेतलेला नसावा.

१८. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार विषयांकीत स्वच्छतागृहे बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च **"मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च ) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च )(२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा,

१९. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८/०६/२०१९ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

२०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११९१७१५२९४११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

William Manwel Dsouza

Digitally signed by William Manwel Dsouza
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Welfare Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7d736942a8f478e484a5c21abe75b8bbf7a0535119974e7126241c3ad35615c8, cn=William Manwel Dsouza
Date: 2019.11.19 17:19:14 +05'30'

( वि.म.डिसोजा )
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव /सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, अमरावती.
३. जिल्हाधिकारी, बुलडाणा.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, बुलडाणा.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.

७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, बुलडाणा.
१०. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई.
११. जिल्हा आरोग्य अधिकारी, बुलडाणा.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलडाणा.
१३. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१५. निवड नस्ती, का.७